**शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालयातील अध्यापकांना गुणवत्ता दर्जा सुधार योजनेंतर्गत उच्च शिक्षणाकरीता प्रतिनियुक्तीवर पाठविण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग,**
**शासन आदेश क्रमांक:-प्रतिनि-२०२२/प्र.क्र.(१७/२२)/तांशि-१**
मंत्रालय विस्तार इमारत,हुतात्मा राजगुरू चौक
मादाम कामा मार्ग, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- २४ जानेवारी, २०२२.

संदर्भ- १) उच्च व तंत्र शिक्षण विभाग,शासन निर्णय क्रमांक-प्रतिनि-३५२०/ प्र.क्र .(९९/२०)/तांशि-७, दि.२४/०२/२०२१
२) संचालक, तंत्र शिक्षण यांचे पत्र क्र. ४अ/आस्था/शास.अभि-क्युआयपी/२०२१-२२/२१, दि.१२/०१/२०२२

**शासन आदेश:-**

शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालयातील खाली नमूद केलेल्या अध्यापकांची त्यांच्या नावासमोर स्तंभ क्र. ४ येथे दर्शविलेल्या संस्थेत गुणवत्ता दर्जा सुधार योजनेंतर्गत उच्च शिक्षणासाठी ( पीएच.डी अभ्यासक्रमासाठी ) सन २०२२-२३ या शैक्षणिक वर्षापासून पुढील ३ वर्षांकरीता निवड झालेली आहे.

| अ. क्र. | अध्यापकाचे नाव व पदनाम | कार्यरत संस्था | पीएच.डी. अभ्यासक्रमाकरीता निवड झालेल्या संस्थेचे नाव |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १. | श्रीमती अर्चना कचरूजी बैले, सहायक प्राध्यापक, भूशास्त्र | शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, अमरावती | भारतीय प्रौद्योगिकी संस्थान, वाराणसी. |
| २. | श्री.आप्पासाहेब प्रभाकर गरगडे सहायक प्राध्यापक, अणुविद्युत अभियांत्रिकी | शासकीय अभियांत्रिकी व संशोधन महाविद्यालय, अवसरी | भारतीय प्रौद्योगिकी संस्थान, मुंबई |
| ३. | श्रीमती लता बाळा आवळे, सहायक प्राध्यापक, विद्युत अभियांत्रिकी | शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, चंद्रपूर | विश्वेश्वरय्या राष्ट्रीय प्रौद्योगिकी संस्थान, नागपूर |

२. संदर्भाधीन क्र.१ येथील शासन निर्णयान्वये गुणवत्ता दर्जा सुधार योजनेंतर्गत शासकीय अभियांत्रिकी/ औषधनिर्माणशास्त्र महाविद्यालये, शासकीय तंत्रनिकेतने व अशासकीय अनुदानित अभियांत्रिकी महाविद्यालये यामधील अध्यापकांना उच्च शिक्षणाकरीता प्रतिनियुक्तीवर पाठविण्यासाठी सुधारीत मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्यात आल्या आहेत. सदर मार्गदर्शक सूचनांनुसार अध्यापकांना पीएच.डी अभ्यासक्रमाकरीता प्रतिनियुक्तीवर पाठविण्यासाठीची पात्रता, प्रतिनियुक्तीवर जाण्यासाठी उमेदवारांस प्रवेश मिळालेल्या संस्थांचे प्राधान्यक्रम निश्चित करण्यात आले आहेत. सदरच्या पात्रता/निकष व प्राधान्यक्रम विचारात घेऊन व संचालक, तंत्रशिक्षण यांच्या स्तरावर गठीत करण्यात आलेल्या निवड समितीच्या शिफारशीस अनुलक्षून, उपरोक्त अध्यापकांना सन २०२२-२३ या शैक्षणिक वर्षापासून ०३ वर्षांच्या कालावधीसाठी पीएच.डी अभ्यासक्रमाकरीता प्रतिनियुक्तीवर पाठविण्यास शासनाची मंजूरी देण्यात येत आहे.

३.	संबंधित अध्यापकांना प्रतिनियुक्तीसाठी कार्यमुक्त करण्यापूर्वी संदर्भाधीन क्र.१ येथील शासन निर्णयामधील अ.क्र. १ (अ) (९) नुसार अध्यापकांकडून हमीपत्र घेण्याची दक्षता संचालक, तंत्रशिक्षण यांनी घ्यावी. सदर अध्यापकांना संस्थेतून कार्यमुक्त केल्याच्या दिनांकापासून त्यांचा प्रतिनियुक्तीचा कालावधी सुरु होईल.

४.	संबंधित अध्यापकांना संदर्भाधीन क्र.१ येथील शासन निर्णयामधील अ.क्र. १ (अ) (७) ते (१४) येथील अटी व शर्ती लागू राहतील.

५.	संबंधित अध्यापकांनी पीएच.डी अभ्यासक्रम पूर्ण केल्यानंतर संदर्भाधीन क्र.१ येथील शासन निर्णयामधील अ.क्र.४ येथे नमूद "अपेक्षित उपक्रम" या शीर्षाखाली नमूद उपक्रम/जबाबदा-या पूर्ण करणे आवश्यक आहे. सदर जबाबदा-या पूर्ण केल्या आहेत किंवा कसे याचा वस्तुनिष्ठ अहवाल प्रतिवर्षी संबंधित अध्यापकांनी स्वयं मूल्यनिर्धारण अहवालासोबत जोडणे आवश्यक राहील व त्याची नोंद सदर अहवालात प्रतिवर्षी घेतली जाईल.

६.	असे प्रमाणित करण्यांत येते की, उपरोक्त अध्यापकांना गुणवत्ता दर्जा सुधार कार्यक्रमानुसार पीएच.डी. अभ्यासक्रमासाठी प्रतिनियुक्तीवर पाठविण्यात आले नसते तर, वरील अभ्यासक्रमाच्या काळात ते त्याच पदावर स्थानापन्न राहीले असते.

७.	सदर आदेश सक्षम प्राधिका-याच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहेत.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०१२४१६४०५९४९०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

SAMEER LAXMAN DHERE

Digitally signed by SAMEER LAXMAN DHERE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e6ab4a357b0e2247b4328b57f45f509bf1bf0bd20c865128a018421c354bddc5, pseudonym=B0341853BBBDA46EBB328D4BE0F460D863592476, serialNumber=6EE64CF9B42881125C3715A5DB341B5827C5743C728BC85F04BB71FF8FC154D6, cn=SAMEER LAXMAN DHERE
Date: 2022.01.24 16:42:39 +05'30'

**( समीर ढेरे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति: -**

संबंधित अध्यापक (तंत्रशिक्षण संचालनालयामार्फत)

**प्रत:-**

१. मा.मंत्री, उच्च व तंत्र शिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
३. सहसंचालक,तंत्रशिक्षण विभागीय कार्यालय, अमरावती/ पुणे/ नागपूर.
४. प्राचार्य, शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, अमरावती/ अवसरी/ चंद्रपूर.
५. जिल्हा कोषागार अधिकारी, अमरावती/ पुणे /चंद्रपूर.
६. निवड नस्ती/तांशि-१.